20110201190704001

महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ च्या कलम १२७ अ व १२७ ब नुसार "मालमत्ता कराची रक्कम आगाऊ भरण्यातून सूट" व "परिस्थितिकीय दृष्ट्या लाभदायक योजनेची अंमलबावणी करण्याकरिता मालमत्ता करातुन सूट किंवा परतावा देणेबाबत"

लातूर नगरपरिषद, जि. लातूर

**महाराष्ट्र शासन**

नगर विकास विभाग,

शासन निर्णय क्रमांक एमयुएम १११०/४४४/प्र क्र १४७/नवि-१७

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक ४ जानेवारी २०११

वाचा:- मुख्याधिकारी, नगरपरिषद लातूर यांचे पत्र क्र. लानप/वसुली/६८३/२००-१० दि. १०.३.२०१०

<u>प्रस्तावना :-</u> महाराष्ट्र शासन राजपत्र, दि. १४ जानेवारी २००९ मध्ये महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ ला सुधारणा करुन नगरपरिषद अधिनियमाच्या कलम १२७ नंतर कलम १२७ अ "मालमत्ता कराची रक्कम आगाऊ भरण्यातून सूट" व १२७ ब "परिस्थितीकीयदृष्टया लाभदायक योजनेची अंमजबजावणी करण्याकरिता मालमत्ता करातून सूट किंवा परतावा" ही कलमे समाविष्ट झाल्यानुसार नगर परिषद लातूर यांनी सर्वसाधारण सभा दि. २६.११.०९ ठराव क्र. १० "शहरातील सोलार / रेन वॉटर हार्वेस्टींगचा वापर करणारे मालमत्ताधारकांना घरपट्टीमध्ये सवलतदेणेबाबत विचार विनिमय करुन निर्णय घेणे" मंजूर केला असून त्यानुसार प्रस्ताव मुख्याधिकारी नगरपरिषद, लातूर यांनी उपरोक्त संदर्भिय पत्राने शासनाकडे सादर केला आहे. सदर प्रस्तावांस मंजूरी देणेची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय :-</u> मुख्याधिकारी, नगरपरिषद लातूर यांच्या संदर्भीय दि. १०.३.२०१० च्या पत्रान्वये प्राप्त प्रस्तावाचा विचार करुन महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ मधील कलम १२७ अ व १२७ ब नुसार महाराष्ट्र शासन मालमत्ता करदात्यांना खालीलप्रमाणे सवलत देण्यास मान्यता देत आहे.

१) दि. १ एप्रिल रोजी जे करदाता संबंधित आर्थिक वर्षाचा पूर्ण मालमत्ता कर एकरकमी भरतील व ज्यांच्याकडे मालमत्ता कराची थकबाकी नसेल त्यांना मालमत्ता करात स्टेट बँक ऑफ इंडिया च्या बचत खात्याच्या व्याजाएवढी सूट देय राहील.

२)     जे मालमत्ता धारक सौर उर्जा, सौर दिवे (solar lights किंवा solar water heater च्या स्वरुपात) इमारतीमध्ये वापरतील किंवा पावसाच्या पाण्याचे साठवण (rain water harvesting) करतील त्यांना मालमत्ता करामध्ये १०% एवढी सवलत देय राहील. तथापि, ही सवलत संबंधित वर्षाचा कराचा भरणा करते वेळी न देता वर्षभरात सदर घटक चालू होते याची प्रत्यक्ष पाहणीतून खात्री करून त्यापुढील वर्षाच्या मालमत्ता कराच्या देयकात मागील वर्षाच्या समाधानकारक कार्यपालनापोटी १०% सूट (rebate) /सवलत म्हणून देण्यात यावी. सदर सवलत वरीलप्रमाणे ५ वर्षांकरीता देय राहील.

३) जे मालमत्ता धारक करपात्र इमारतीच्या परिसीमेत सांडपाण्याच्या पुनर्वापराच्या उपाययोजना राबवतील त्यांना मालमत्ता करामध्ये ५% सवलत देय राहील. मात्र सदर सवलत संबंधित वर्षाचा कराचा भरणा करतेवेळी न देता वर्षभरात सदर घटक चालू होते याची प्रत्यक्ष पाहणीतून खात्री करुन त्यापुढील वर्षाच्या मालमत्ता कराच्या देयकात मागील वर्षाच्या समाधानकारक कार्यपालनापोटी ५% सूट म्हणून देण्यात यावी. सदर सवलत वरीलप्रमणे १० वर्षांकरीता देय राहील

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( अ.बा.घरत )
शासनाचे उपसचिव

प्रति.

आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई - ३०
विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय,औरंगाबाद
जिल्हाधिकारी, लातूर
मुख्याधिकारी, नगरपरिषद लातूर
कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
सदरचा शासन निर्णय या विभागाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्याकरिता.
निवडनस्ती (नवि-१७) नगर विकास विभाग

D:\Tippani Latur G.R.